**विषय : खेडेगावातील / नगरपालिका / महानगरपालिकेच्या हद्दीतील देशी / विदेशी मद्य विक्रीचे लायसन्स बंद करण्याची कार्यवाही करण्याबाबत कार्यपध्दती.**

**परिपत्रक**

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
क्र.विसप्र-१०९४/१०८८९०/इएक्ससी-३
दिनांक : १९ सप्टेंबर, २००२

वाचावे:-*१) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.१४.०७.१९९३*
*२) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.११.१०.१९९३*
*३) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.२१.१२.१९९३*
*४) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.३०.०९.१९९४*
*५) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.२३.११.१९९४*
*६) शासन पत्र, गृह विभाग क्र.बीपीए १२९३/२२९, दि.०१.०१.२००१.*

**प्रस्तावना:-**

अवैधरित्या निर्मिती करुन हात भट्टीची दारु सेवन केल्यामुळे दुष्परिणाम दृष्टीपथास आले म्हणून राज्यातील जनतेला शासन नियंत्रीत किरकोळ विक्री दुकानामार्फत देशी दारुची विक्री करण्यास शासनाने मान्यता दिली. तथापि, कांही गावात किंवा शहरामध्ये अशा शासन मान्य देशी दारु दुकानामुळे उपद्रव संभवतात, कधी कधी कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होतो व त्यामुळे सामाजिक स्वास्थ बिघडण्याची शक्यता असते. तर काही गावांमध्ये दारुबंदीचा ठराव करुन त्याची अंमलबजावणी करण्याबाबतचा आग्रह असतो. या विविध बाबींचा विचार करुन शासनाने उपरोक्त परिस्थितीत दारु विक्रीची दुकाने बंद करावयाचे असल्यास कोणती कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी, याबाबत उपरोक्त संदर्भात नमूद केल्याप्रमाणे परिपत्रके/मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. तथापि, शासनाचे असे निदर्शनास आले आहे की, काही कार्यालयांत असे सर्व मार्गदर्शक तत्वे उपलब्ध नाहीत किंवा काही प्रकरणात कार्यवाही करतांना सुस्पष्टता नसल्यामुळे कार्यवाही करण्यास क्षेत्रीय अधिकाऱ्यांना अडचणी येतात. म्हणून या परिपत्रकाव्दारे देशी दारुची दुकाने बंद करण्यासाठी कोणती कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी याबाबतचे आदेश संदर्भाधीन शासन पत्रे अनुक्रमे १ ते ६ नुसार निर्गमित करण्यात आलेले आहेत. परंतु, याबाबत एकत्रितरित्या परिपत्रक काढावे म्हणून अनेक संस्थांची

आणि व्यक्तींची मागणी होती. म्हणून या विषयाची संदर्भाधीन सर्व परिपत्रके अधिक्रमित करुन शासन पुढील प्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे.

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, एखाद्या गांवात अथवा नगरपालिका किंवा महानगरपालिकेच्या वार्डात एखादी मद्य विक्रीची अनुज्ञप्ती बंद करण्यात यावी याबाबत ग्रामसभा, ग्रामपंचायत, नोंदणीकृत महिला मंडळ अथवा इतर सामाजिक संस्थांनी अथवा मतदारांनी अथवा महिला मतदारांनी ठराव करुन निर्णय पारीत केला तर त्या गावातील किंवा नगरपालिका अथवा महानगरपालिका संबंधीत वॉर्डातील देशी दारुचे दुकान (CL-III) बंद करण्यात यावे. तसेच जर त्या गावातील अथवा महानगरपालिका अथवा नगरपालिकेच्या वार्डातील जर एखाद्या परवानाकक्ष, बिअरबार, विदेशी दारु विक्रीचे लायसन्स (FL-II, FL-III, Form-E लायसन्स) बंद करण्याबाबत ठराव पारीत झाला असेल तर त्या ठरावात नमूद केलेले विदेशी मद्य विक्रीचे लायसन्स देखील बंद करण्यात यावे. यासंदर्भात पुढीलप्रमाणे मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत आहेत.

***मार्गदर्शक तत्वे :-***

(१) उपरोक्त नमूद केलेल्या देशी/भारतीय बनावटीच्या विदेशी मद्याची किरकोळ विक्री करणाऱ्या लायसन्सच्या बाबतीत महिला मंडळे / महिला कल्याणकारी संघटना, सामाजिक संस्था इत्यादी ज्या धर्मादाय आयुक्त यांचेकडे नोंदणीकृत आहेत, त्यांच्याकडून असे मद्य विक्री करणाऱ्या लायसन्समुळे त्या परिसरातील उपद्रवामुळे कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होऊन सामाजिक स्वास्थ बिघडण्याची शक्यता आहे, अशा प्रकारच्या तक्रारी संबंधित जिल्हाधिकारी यांना प्राप्त झाल्यास त्याची शहानिशा करुन मुंबई दारुबंदी अधिनियम, १९४९ चे कलम ५४ अथवा ५६ अन्वये असे लायसन्स बंद करण्यात यावे. मात्र सदरचा ठराव नोंदणीकृत संस्थानी संबंधित संस्थेची नोंदणी करतांना ठराव पारीत करण्याबाबत ज्या अटी व शर्ती नमूद केल्या असतील त्या अटी व शर्ती नुसार ठराव झालेला असला पाहिजे.

(२) संबंधित गावातील ग्रामपंचायतीने एकमताने ठराव पारित केल्यास ठरावानुसार गावातील मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याची कार्यवाही जिल्हाधिकाऱ्यांनी करावी. या ठरावाविरुद्ध ग्रामपंचायतीने पुन्हा लायसन्स चालू करण्याचा ठराव केल्यास असा ठराव विचारात घेण्यात येऊ नये.

(३) ग्रामसभेत किमान ५० टक्के मतदार उपस्थित राहून साध्या बहुमताने विधीवत ठराव पारित केल्यास ठरावानुसार मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्यात यावेत. परंतु ग्रामसभेने अशा रितीने ठराव पारित केल्यानंतर ग्रामसभेच्या ठरावाच्या विरुध्द ग्रामपंचायतीने कोणताही ठराव केल्यास तो विचारात घेण्यात येऊ नये. तसेच कालांतराने ग्रामसभेतही बंद झालेले मद्य विक्रीचे लायसन्सबाबत पुन्हा चालू करण्याबाबत ठराव झाल्यास अशा प्रकारचा ठराव विचारात घेण्यात येऊ नये. ग्रामपंचायत अथवा ग्रामसभेचा ठराव हा मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ आणि मुंबई ग्रामपंचायत (ग्रामसभा) नियमावली, १९५९ च्या तरतुदीनुसार विधीवत झालेला असला पाहिजे.

(४) एखाद्या गावातील २५ टक्के महिला मतदारांनी संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे लेखी निवेदन देऊन त्या गावातील मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याबाबत मागणी केल्यास मतदारांना निर्भयपणे मत व्यक्त करता यावे म्हणून जिल्हाधिकारी संबंधित तहसिलदार यांना गुप्त पध्दतीने मतदान घेण्याबाबतचे निर्देश देतील. त्यानंतर संबंधित तहसिलदार यांनी मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ निश्चित करुन त्याबाबतची पुर्वसूचना त्या गावात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील व त्यानंतर तहसिलदार किंवा त्यांनी प्राधिकृत केलेला नायब तहसिलदार यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याच्या पर्यवेक्षणाखाली महिला मतदार गुप्त पध्दतीने मतदान करतील. गावातील एकुण महिला मतदारांच्या संख्येच्या किमान ५० टक्क्यापेक्षा अधिक महिला मतदारांनी मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याबाबतच्या बाजूने मतदान केल्यास असे मद्य विक्रीचे लायसन्सेस जिल्हाधिकारी बंद करतील. मतदानासाठी ग्रामपंचायतीच्या निवडणुकीसाठी तयार केलेली Latest (अद्यावत) मतदार यादी वापरण्यात यावी.

(५) नगरपालिका/महानगरपालिका क्षेत्रातील एखाद्या वार्डातील किमान २५ टक्के महिला मतदारांनी जिल्हाधिकारी यांचेकडे लेखी निवेदन देऊन संबंधित वार्डातील मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याची मागणी केल्यास जिल्हाधिकारी संबंधित मुख्याधिकारी / उप आयुक्त यांना गुप्त पध्दतीने मतदान घेण्याचे निर्देश देतील. त्यानंतर संबंधित मुख्याधिकारी/ उप आयुक्त अगोदर ठिकाण, तारीख व वेळ निश्चित करुन त्याबाबतची पुर्वसूचना त्या वार्डात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील. आणि त्यानंतर मुख्याधिकारी/उपआयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेला अनुक्रमे उपमुख्याधिकारी/सहाय्यक आयुक्त यांच्यापेक्षा कमी दर्जाच्या नसलेल्या

अधिकाऱ्याच्या पर्यवेक्षणाखाली त्या वार्डातील महिला मतदार गुप्त पध्दतीने मतदान करतील. त्या संबंधित वार्डातील एकूण महिला मतदारांच्या संख्येच्या किमान ५० टक्क्यापेक्षा अधिक महिला मतदारांनी मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याबाबतच्या बाजूने मतदान केल्यास त्या वार्डातील संबंधित मद्य विक्रीचे लायसन्सेस जिल्हाधिकारी बंद करतील.

(६) एखाद्या गावातील किंवा नगरपालिका / महानगरपालिका असल्यास संबंधीत वार्डातील किमान २५ टक्के मतदारांनी मद्य विक्रीचे लायसन्स बंद करण्याची लेखी निवेदनाव्दारे जिल्हाधिकारी यांचेकडे मागणी केल्यास जिल्हाधिकारी संबंधित तहसिलदार / मुख्याधिकारी / उप आयुक्त यांना गुप्त पध्दतीने मतदान घेण्याचे निर्देश देतील. संबंधित तहसिलदार / मुख्याधिकारी / उप आयुक्त मतदानाचे ठिकाण, तारीख व वेळ निश्चित करुन त्याबाबतची पूर्वसूचना त्या गांवात/वार्डात किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील. गावातील अथवा नगरपालिका/ महानगरपालिका असल्यास संबंधित वार्डातील एकूण मतदारांच्या किमान ५० टक्क्यापेक्षा अधिक मतदारांनी मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याबाबत मतदान केल्यास सदरचे मद्य विक्री लायसन्सेस जिल्हाधिकारी बंद करतील.

(७) गावातील मद्यविक्रीचे लायसन्स बंद करण्याबाबत जर गुप्त मतदान घेण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी निर्णय घेतला तर खेडेगांवात मतदानाबाबतचे ठिकाण, तारीख, व वेळ याबाबत किमान ७ दिवस अगोदर त्या गावातील ग्रामपंचायत कार्यालयातील नोटीस बोर्डावर नोटीस लावण्यात यावी. तसेच गावात दवंडी देऊनही ग्रामस्थांना माहिती देण्यात यावी.

(८) जर महानगरपालिका अथवा नगरपालिकेतील एखाद्या वार्डातील मद्यविक्रीचे लायसन्स बंद करण्याबाबत गुप्त मतदान घेण्याचा निर्णय जिल्हाधिकारी यांनी घेतला तर त्या वार्डाच्या संबंधित वार्ड ऑफिसमध्ये आणि नगरपालिका अथवा महानगरपालिकेच्या मुख्यालयातील नोटीस बोर्डावर मतदानाबाबतचे ठिकाण, तारीख व वेळ याबाबत किमान ७ दिवस अगोदर नोटीस प्रसिद्ध करण्यात यावी.

(९) मतदानाची जागा मतदान घेणाऱ्या संबंधित अधिकाऱ्याने ठरवावी. परंतु, शक्यतो अशा जागेची निवड करताना ग्रामपंचायत / नगरपालिका / महानगरपालिकेच्या निवडणुकीच्या मतदानासाठी ज्या तत्वावर मतदानाची जागा निवडली जाते, त्या तत्वावर जागेची निवड करावी.

(१०) गुप्त मतदानाची वेळ सकाळी ०८.०० ते दुपारी ०२.०० वाजेपर्यंत ठेवण्यात यावी.

(११) गुप्त मतदानासाठी लागणाऱ्या मतपत्रिकेसाठी नमुना सोबत जोडलेला आहे.

(१२) संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे मद्य विक्रीचे लायसन्सेस बंद करण्याबाबत निवेदन प्राप्त झाल्यानंतर आवश्यक ती अंतिम कार्यवाही एक महिन्याच्या आत पूर्ण करावी. यापेक्षा जास्त कालावधीची आवश्यकता असल्यास संपूर्ण समर्थनासह प्रस्ताव सादर करुन आयुक्त (राज्य उत्पादन शुल्क) यांची पूर्वमान्यता घेण्यात यावी.

(१३) मतमोजणी ही मतदानाच्या दिवशी दुपारी ४.०० वाजता केली जाईल. मतमोजणीचे ठिकाण, तारीख व वेळ संबंधीतीत तहसिलदार/मुख्याधिकारी/उपआयुक्त वरील बाब क्रमांक (७) व (८) मध्ये नमूद केल्याप्रमाणे किमान ७ दिवस अगोदर जाहीर करतील.

(१३) मतमोजणी ही वरील बाब क्रमांक (४) व (५) मध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्याच्या पर्यवेक्षणाखाली केली जाईल.

(१४) संबंधीतीत मतमोजणी अधिकारी मतमोजणीनंतर मतमोजणीचा निकाल तात्काळ जाहीर करतील व त्वरित जिल्हाधिकारी यांना अहवाल सादर करतील.

(सी. बी. चौधरी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

१) सर्व अधिक्षक, राज्य उत्पादन शुल्क.

२) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.

३) सर्व जिल्हाधिकारी.

४) सर्व आयुक्त, महानगरपालिका.

५) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका.

६) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई

७) सर्व विभागीय आयुक्त, महसूल विभाग.

८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद.
यांना सूचित करण्यात येते की, उपरोक्त सूचना त्यांच्या अधिनस्थ सर्व ग्रामपंचायतींच्या निदर्शनास तात्काळ आणाव्यात.

## गुप्त मतदानासाठी मतपत्रिकेचा नमुना

---

(१) गावाचे नाव / (महानगरपालिका / नगरपालिका असल्यास वार्डाचे नाव) :

(२) सीएल-३ / एफएल-२ / एफएल-३ / नमुना-ई लायसन्स धारकाचे नाव / अनुज्ञप्तीवरील फर्मचे नाव :

(३) मतदानाची तारीख व वेळ :

---

मद्य विक्री लायसन्स चालू ठेवावे



---

मद्य विक्री लायसन्स बंद करावे



---

मतदान अधिकाऱ्याची सही